शासकीय गोदाम दुरूस्ती कामांसाठी निधी उपलब्ध करून देणेबाबत.
(सन २०२१-२२)

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गोदादु-११२१/प्र.क्र.१५९/नापु-१६ ब**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ११ फेब्रुवारी, २०२२.

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः गोदादु- १११७/प्र.क्र.१३७५/नापु-१६ ब,दि.११.०७.२०१८.
२) शासन निर्णय क्रमांकः गोदादु- १११७/प्र.क्र.१३७५/नापु-१६ ब,दि.२१.०८.२०१८.
३) शासन पत्र क्र.गोदादु-१११६/प्र.क्र.१३२३/नापु-१६ब, दि.२२.११.२०१८.
४) शासन निर्णय क्रमांकः गोदादु- १११९/प्र.क्र.५१/नापु-१६ ब,दि.१०.०६.२०२१.
५) शासन निर्णय क्रमांकः गोदादु- १११८/प्र.क्र.७८/नापु-१६ ब,दि.३०.०६.२०१८.
६) शासन निर्णय क्रमांकः गोदादु- १११८/प्र.क्र.७८/नापु-१६ ब,दि.१४.०८.२०१८.
७) शासन निर्णय क्रमांकः गोदादु- १११८/प्र.क्र.७८/नापु-१६ ब,दि.०४.०९.२०१८.
८) शासन निर्णय क्रमांकः गोदादु- १११९/प्र.क्र.३२/नापु-१६ ब,दि.१०.०५.२०१९.
९) शासन निर्णय क्रमांकः गोदादु- १११९/प्र.क्र.३२/नापु-१६ ब,दि.२४.०७.२०१९.
१०) शासन निर्णय क्रमांकः गोदादु- ११२०/प्र.क्र.८२/नापु-१६ ब,दि.३१.०३.२०२१.
११) समक्रमांक शासन निर्णय दिनांक ०१.१०.२०२१.

प्रस्तावना :-

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत राज्यातील शिधापत्रिकाधारकांना जीवनावश्यक वस्तूचे वितरण करण्यात येते. भारतीय अन्न महामंडळाकडून प्राप्त होणाऱ्या अन्नधान्याची साठवणूक राज्य शासनाच्या गोदामामध्ये केली जाते. सदरहू राज्य शासकीय गोदामांच्या दुरुस्तीच्या प्रस्तावांची सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेकडून आवश्यकतेनुसार छाननी केल्यानंतर गोदाम दुरुस्ती कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यता दिलेल्या गोदाम दुरूस्ती कामांना निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रशासकीय मान्यतेसंदर्भातील संदर्भीय शासन निर्णयातील नमूद अटींच्या अधीन राहून खालील गोदाम दुरुस्ती कामांना पुढील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे निधी उपलब्ध करून देण्यात येत आहे.

| अ. क्र. | जिल्हा | तालुका | गोदामाचे नाव | कामाचे स्वरूप | प्रशासकीय मान्यते नुसार अंदाजित खर्च (₹) | सदर आदेशान्वये वितरित करण्यात येत असलेला निधी (₹) |
|---|---|---|---|---|---|---|
| १) | पालघर | जव्हार | जव्हार शासकीय धान्य गोदाम क्र.१ | जुने लोखंडी पत्रे काढून प्री कोटेड शिटस बसविणे, मोडकळीस आलेले दरवाजे खिडक्या बदलणे, रोलींग शटर व कोल्याप्सीबल गेट बसविणे.जुने प्लास्टर व रंगकाम करणे, सुरक्षा रक्षक कक्षाचे बांधकाम, अस्तित्वातील संरक्षक भिंत व गेटची दुरुस्ती करणे, कॉंक्रिट रस्त्याचे बांधकाम करणे व इतर आवश्यक बाबी इ. | ७६,७९,००९ | ३७,८०,४८५ |
| २) | पालघर | जव्हार | जव्हार शासकीय धान्य गोदाम क्र.२ | लोखंडी पत्रे काढून प्री-कोटेड शीटस बसविणे,दरवाजा खिडक्या बदलणे, रोलीग शटर बसविणे,प्लास्टर करणे, रंगकाम करणे, संरक्षक भिंत व गेटची दुरुस्ती करणे इ. | ४६,८७,८५३ | ९,४८,५४७ |
| ३) | पालघर | मोखाडा | मोखाडा | शासकीय गोदाम क्र.१ साठी वेदर शेड तयार करणे, प्लॅटफॉर्म तयार करणे, पायाचे मजबूतीकरण करणे, प्लॅस्टरींग व रंगरंगोटी करणे इ. | १९,०९,९७२ | २,४३,६२८ |
| ४) | पालघर | मोखाडा | मोखाडा | शा.गो.क्र.२ साठी रोलींग शटर बसवणे, वेदर शेड तयार करणे, कॉक्रीट रस्ता बनवणे, प्लॅस्टरींग करणे, रंगरंगोटी करणे व पत्रे बसवणे इ. | १६,३०,१९६ | १,३४,७०० |
| ५) | पालघर | विक्रमगड | विक्रमगड | शासकीय गोदामास सुरक्षा भिंत बांधणे (भाग-१) | १९,९१,४८८ | २,७५,३६६ |

| अ. क्र. | जिल्हा | तालुका | गोदामाचे नाव | कामाचे स्वरूप | प्रशासकीय मान्यते नुसार अंदाजित खर्च (₹) | सदर आदेशान्वये वितरित करण्यात येत असलेला निधी (₹) |
|---|---|---|---|---|---|---|
| ६) | पालघर | विक्रमगड | विक्रमगड | शासकीय गोदामास सुरक्षा भिंत बांधणे (भाग-२) | १५,४७,३०७ | १,०२,४२८ |
| ७) | ठाणे | भिवंडी | भिवंडी गोदाम क्र.१, २ व ३ | गोदामांच्या छतांची दुरुस्ती करणे, नवीन लाद्या बसविणे, अंतर्गत रस्ता व गटार इत्यादी कामे . (अंदाजपत्रकाप्रमाणे) | १,५४,२७,९७७ | १,०६,००,००० |
| ८) | ठाणे | कल्याण | आधारवाडी | गोदामाचे जुने पत्रे काढून नविन पत्रे बसविणे, खिडक्यांची दुरुस्ती करणे व रोलिंग शटर्सचे दुरुस्तीचे काम करणे, लाद्या बसविणे इत्यादी(अंदाजपत्रकाप्रमाणे) . | ४५,२१,०४७ | ३२,७२,८६१ |
| **एकूण** | | | | | **३,९३,९४,८४९** | **१,९३,५८,०१५** |
| **(अक्षरी रुपये:- एक कोटी त्र्याणव लक्ष अठ्ठावण हजार पंधरा फक्त)** | | | | | | |

२. वरीलप्रमाणे निधी उपलब्ध करून दिलेल्या शासकीय गोदाम दुरुस्तीची कामे तातडीने पूर्ण करण्यात यावीत.

३. सदरील शासकीय गोदाम दुरुस्तीची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी घ्यावी.

४. सदर गोदामाच्या दुरूस्तीचे काम पूर्ण झाल्यानंतर सदरचे काम हे मंजूर अंदाजपत्रकाप्रमाणे उत्कृष्ट झाल्याबाबतची खातरजमा संबंधीत कार्यकारी अंभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग व जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी संयुक्तरित्या करून तसा स्थल निरिक्षण अहवाल तयार करावा व तो अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

५. दुरूस्तीस विलंब अथवा इतर कारणांनी गोदाम दुरूस्तीस वाढीव खर्च होणार नाही याबाबतची दक्षता घ्यावी. सदरहू निधी ठेव अंशदान म्हणून वर्ग करता/ठेवता येणार नाही, याची नोंद घ्यावी.

६. सन २०२१-२२ या वित्तीय वर्षामध्ये सदर गोदाम दुरूस्तीचा खर्च "मागणी क्रमांक एम-२, मुख्य लेखाशिर्ष २४०८ अन्न साठवण व वखार साठवण, (०३) प्रापण वितरण व किंमत नियंत्रण (०३)

(०२) मुफसल, (योजनेतर) (दत्तमत) (२४०८ ०१०८) २७ लहान बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. त्याचप्रमाणे काही कारणास्तव संबधित गोदाम दुरूस्तीचे कामावर उपलब्ध करून दिलेला निधी खर्ची पडण्याची शक्यता नसल्यास त्याबाबतच्या कारणमीमांसेसह शासनास अहवाल सादर करावा. सदरहू आदेशान्वये वितरित केलेला निधी **दि.२८ फेब्रुवारी, २०२२ पूर्वी** खर्च न झाल्यास सदर निधी काढून घेण्याची कार्यवाही वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालयामार्फत करण्यात यावी.

८. संबंधित गोदाम दुरुस्तीकामासाठी प्रशासकीय मान्यता आदेशानुसारच्या खर्चापेक्षा अधिक निधी वितरीत होणार नाही याबाबत संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांची राहील.

९. प्रशासकीय मान्यतेच्या आदेशात कामाचे संक्षिप्त स्वरूप नमूद करण्यात आलेले असून प्रत्यक्षात गोदाम दुरूस्तीचे काम सादर केलेल्या दुरुस्ती कामांच्या अंदाजपत्रकानुसारच पूर्ण करण्यात यावे. म्हणजेच सादर केलेल्या अंदाजपत्रकात समाविष्ट बाबीनुसार गोदाम दुरूस्तीचे काम पूर्ण करण्यात यावे.

१०. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग पहिला उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १० नुसार तसेच महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१११६५७२६७३०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Deodatta Tungar

Digitally signed by Sudhir Deodatta Tungar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b555e4e3006da7480655b52484794686f18de73c0a909267b188c86a755c75, pseudonym=5E1F07FF6933630D1833271F4B68D3392A0A1127, serialNumber=204E151470E2D21694C51F66F9B5A8FAAE544D15F6BFA4851335010591835680, cn=Sudhir Deodatta Tungar
Date: 2022.02.11 16:59:32 +05'30'

**( सुधीर तुंगार )**
शासनाचे सह सचिव

**प्रत,**

१. उप आयुक्त ( पुरवठा ), कोकण.

२. वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.

३. जिल्हाधिकारी, पालघर व ठाणे.

४. जिल्हा पुरवठा अधिकारी, पालघर व ठाणे.

५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पालघर व ठाणे.

६. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर व ठाणे.

७. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.

८. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.

९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उपसचिव मार्फत)

१०.वित्त विभाग (व्यय-१०, अर्थोपाय व अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई.

११.नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय, मुंबई.

१२.सहाय्यक संचालक (संगणक), लेखा व कोषागारे, मुंबई/नागपूर.

१३. निवड नस्ती/नापु-/१६ब.